सन २०१८-२०१९ या आर्थिक वर्षातील अर्थसंकल्पीय अनुदाने.
ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र, अमरावती, जि.अमरावती यांना
देण्यात यावयाच्या अनुदानाचे वाटप लेखाशिर्ष-२४१५ ०३३९.
(तिसरा हप्ता) ( माहे जानेवारी ते मार्च ,२०१९)

**महाराष्ट्र शासन**

ग्राम विकास विभाग

**शासन निर्णय क्रमांकः अनुग्रा २०१८/प्र.क्र.४६/आस्था-१५**
**बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ,**
**फोर्ट, मुंबई- ४०० ००१.**
**दिनांक : १८ फेब्रुवारी, २०१९.**

वाचा -

१) शासन निर्णय क्रमांक - ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक प्रशिक्षण-२०९३/प्र.क्र. ८४५/०९, दि.१७.०९.१९९३.
२) शासन परिपत्रक क्रमांक- ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक- प्रशिक्षण १९९९/प्र.क्र.५८१/६१, दिनांक २३.९.१९९८.
३) शासन परिपत्रक क्रमांक-ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक-प्रशिक्षण-२०००/ प्र.क्र.८५९/४४, दि.१२.६.२००१
४) शासन निर्णय क्रमांक- ग्राम विकास विभाग अनुग्रा २०१८/प्र.क्र.४६/आस्था-१५, दिनांक १७ मे,२०१८
५) शासन निर्णय क्रमांक- ग्राम विकास विभाग अनुग्रा २०१८/प्र.क्र.४६/आस्था-१५, दिनांक १ ऑक्टोबर,२०१८

## शासन निर्णय-

सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरीता २४१५, कृषि विषयक संशोधन व शिक्षण ०१- पीक संवर्धन, १२०- इतर संस्थांना सहायक, (पी) (१) ४१ ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्रांना सहायक अनुदाने - (०१) इतर संस्थांना सहाय्य (०१)(०३) श्री. शिवाजी शिक्षण संस्था, अमरावती यांच्या विद्यमाने अमरावती ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र, अमरावती याची स्थापना करणे व त्याचा दर्जा वाढविणे (अनिवार्य) ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर), ३६, सहायक अनुदाने (वेतन) (सांकेतांक क्र.२४१५ ०३३९), (योजनेत्तर)(दत्तमत) ( मागणी क्र. एल -३) अंतर्गत ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र, अमरावती यांना वेतनेतरसाठी रु. १०.०० लक्ष (रु.दहा लक्ष) व वेतनासाठी रु.३५.५० लक्ष (रु.पस्तीस लक्ष, पन्नास हजार) असे एकूण रु. ४५.५० लक्ष (रु.पंचेचाळीस लक्ष, पन्नास हजार) इतकी तरतूद अर्थसंकल्पित करण्यात आलेली आहे.

२. सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाच्या माहे एप्रिल ते ऑगस्ट , २०१८ या कालावधीकरिता वेतनेतरसाठी रु.२.९० लक्ष (रु.दोन लक्ष, नव्वद हजार) व वेतनासाठी रु.१०.३५ लक्ष (रु.दहा लक्ष, पस्तीस हजार) असे एकूण रु. १३.२५ लक्ष (रु.तेरा लक्ष, पंचवीस हजार) इतके अनुदान दिनांक १७ मे, २०१८ च्या शासन निर्णयान्वये आणि माहे सप्टेंबर ते डिसेंबर , २०१८ या कालावधीकरिता वेतनेतरकरिता रुपये ४.१० लक्ष (रु.चार लक्ष, दहा हजार ) व वेतनासाठी रुपये १४.५० लक्ष (रु. चौदा लक्ष, पन्नास हजार) असा एकूण रुपये १८.६० लक्ष (रु. अठरा लक्ष, साठ हजार) इतका निधी दुसरा हप्ता म्हणून दिनांक १ ऑक्टोबर,२०१८ च्या शासन निर्णयान्वये ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र, अमरावती यांच्याकरिता वितरित करण्यात आलेला आहेत.

३. सन २०१८-१९ च्या उर्वरित कालावधीसाठी वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र . अर्थसं-२०१८/ प्र.क्र.६९/ अर्थ-३, दि.२५ जानेवारी, २०१९ अन्वये महसूली लेख्यातील निधी ९०% या मर्यादेत वितरीत करावयाचा आहे. तसेच ३६ सहायक अनुदाने (वेतन) करीता १००% तरतूदीच्या प्रमाणात निधी वितरीत करावयाचा आहे. त्याअनुषंगाने माहे जानेवारी ते मार्च , २०१९ या कालावधीकरिता ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र, अमरावती यांना वेतनेतरसाठी रु.२.०० लक्ष (रु. दोन लक्ष) व वेतनासाठी रु.१०.६५ लक्ष (रु. दहा लक्ष, पासष्ट हजार) असा एकूण रु. १२.६५ लक्ष (रु. बारा लक्ष, पासष्ट हजार) इतका निधी तिसरा हप्ता म्हणून वितरित करण्यात येत आहे.

४. प्रशिक्षण केंद्राना अनुदान द्यावयाच्या कार्यपध्दतीबाबत शासन परिपत्रक क्र . प्रशिक्षण ११९८/ प्र.क्र.५८१/६१, दिनांक २३ सप्टेंबर १९९८ व शासन परिपत्रक ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र. प्रशिक्षण २०००/ प्र.क्र.८५९ /४४, दिनांक १२ जून, २००१ अन्वये निर्गमित करण्यात आलेल्या सूचनांच्या अनुषंगाने संबंधित उपायुक्त (आस्था), विभागीय आयुक्त कार्यालय यांनी सदर प्रशिक्षण केंद्रास अनुदान अदा करण्याबाबत त्वरीत कार्यवाही करावी. तसेच संदर्भ क्रमांक १ येथे दर्शविलेल्या शासन निर्णयातील परिच्छेद क्र. १२ मधील अटीनुसार केंद्रानी खर्च करावा.

५. सदर निधी वितरणाकरिता तसेच निधी ज्या बाबींकरीता मंजूर करण्यात आला आहे , त्याच बाबींवर खर्च करण्यात येईल याची काटेकोर अंमलबजावणी करण्याची जबाबदारी संबंधित उपायुक्त (आस्था), विभागीय आयुक्त कार्यालय यांची असेल. तसेच सदर निधीचे उपयोगिता प्रमाणपत्रही तात्काळ सादर करण्याची दक्षता घेण्यात यावी.

६. विभागीय आयुक्त कार्यालयाने ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्रास दरमहा अनुदान वितरीत करताना वेतन व वेतनेतर बाबीवर प्रत्यक्ष किती अनुदानाची आवश्यकता आहे याची खातरजमा करुन त्यांना आवश्यक तेवढी रक्कम उपलब्ध करुन द्यावी. मात्र उपरोक्त नमूद केलेल्या अनुदानापेक्षा जास्त अनुदान वितरीत केले जाणार नाही याची दक्षता घ्यावी. तसेच प्राचार्य, ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र यांनी वेतन/वेतनेतर खर्चाकरिता दरमहा किती अनुदान आवश्यक आहे , याची पूर्वसूचना संबंधित आयुक्त कार्यालयास द्यावी. त्याप्रमाणे आयुक्त कार्यालयाने वेतन /वेतनेतर खर्चाकरिता अनुदान वितरीत करावे. आवश्यक असलेल्या अनुदानाबाबत पूर्वसूचना न दिल्यास त्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित प्रशिक्षण केंद्रांच्या प्राचार्यांची असेल.

७. हा खर्च मागणी क्र.एल ३,"२४१५, कृषि विषयक संशोधन व शिक्षण" (पी) (०३) (०२) ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र संकेतांक क्र. (२४१५ ०३३९) ३६, सहायक अनुदाने (वेतन) ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि तो यावर्षी लेखाशिर्षातर्गत केलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा. तसेच सदर खर्च त्याच संकेतांकाखाली खर्च पडतो आहे या बाबत ताळमेळ घालून खातरजमा करावी व विभागीय आयुक्तांनी दरमहा शासनास कळवावे . सदर लेखाशिर्षाचे अहरण व संवितरण अधिकारी म्हणून विभागीय आयुक्त काम पाहतील.

८. नियोजन व वित्त विभागाने यापूर्वी निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना प्रचलित निकष वित्तीय अधिकारांचे प्रत्यायोजन तसेच वित्त विभागाच्या दि.०२ एप्रिल, २०१८ व २७ जुलै, २०१८ व दिनांक ५ डिसेंबर २०१८ च्या परिपत्रकातील अटी व शर्तीचे संबंधितांनी काटेकोरपणे पालन करावे.

९. या अनुदानातून संबंधित प्रशिक्षण केंद्राने केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचा अधिकार महालेखापाल, (लेखा) महाराष्ट्र-१ मुंबई आणि/किंवा महालेखापाल (लेखा) महाराष्ट्र-२ नागपूर यांना राहील व त्यांना त्यांचे हे काम योग्य तऱ्हेने पार पाडता यावे म्हणून संबंधित प्रशिक्षण केंद्र / संस्था, मदत / सुविधा पुरवतील.

१०. हा शासन निर्णय वित्तीय अधिकार नियमपुस्तिका १९७८ भाग १ ला, उपविभाग १ ते ५ मधील तरतूदीनुसार शासन निर्णय दिनांक १५/५/२००९ सोबतच्या उप विभाग - ३ मधील अ.क्र. १ परि. १६२, १६३, १६४ नुसार प्रशासकिय विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारांचा वापर करून व

वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१८/ प्र.क्र.६९/ अर्थ-३, दि.२५ जानेवारी, २०१९ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

११. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०२१८११४०१६२८२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Shashank Y Barve
Date: 2019.02.18 13:10:11 +05'30'

( शशांक य. बर्वे )
**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन.**

प्रत,

१. विभागीय आयुक्त, अमरावती (२ प्रती)
२. उप आयुक्त (आस्था), विभागीय आयुक्त कार्यालय, अमरावती.
३. जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती.
४. महालेखापाल, (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र - १, मुंबई.
५. महालेखापाल, (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र-२, नागपूर.
६. महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, बाणेर रोड, पुणे
७. उप महासंचालक राज्य ग्रामीण विकास संस्था (यशदा), बाणेर रोड, पुणे
८. वित्त विभाग, कार्यासन क्र. अर्थ-१७/व्यय-१५
९. प्राचार्य, ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र, शिवाजीनगर, जि. अमरावती.
१०. कार्यासन क्र. वित्त-१, वित्त-६, वित्त-७, वित्त-८ ग्राम विकास विभाग.
११. निवड नस्ती का.क्र. आस्था-१५, ग्राम विकास विभाग.